राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) यांच्याकडून मार्जिन मनी लोन योजनेंतर्गत राज्य शासनास प्राप्त झालेले रु.५४९.५४ कोटी कर्ज वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पूरक ०६२३ /प्र.क्र.६८/३स**
मंत्रालय विस्तार रूम नं. ६०२ , मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक , मुंबई-४०००३२
दिनांक : ०३ ऑगस्ट, २०२३

**संदर्भ :-** १.सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक:ससाका२०१९/प्र.क्र.८०/३स, दिनांक ०५.०९.२०१९.

२. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक:ससाका२०२३/प्र.क्र.२३/३स, दिनांक ०४.०५.२०२३

३. विभागाचे क्रमांक:ससाका ०५२३/प्र.क्र.६२/३स, राष्ट्रीय सहकार विकास निगम यांना लिहिलेली दिनांक १२ जून, २०२३ व दिनांक २८ जून, २०२३ रोजीची पत्रे

४. राष्ट्रीय सहकार विकास निगम यांचे क्रमांक:एनसीडीसी:२१-८/२०२३-शुगर/१५०/एसबी३०१२५/९०, दिनांक २७ जून, २०२३(कर्जमंजुरी)

५. वित्त विभाग परिपत्रक क्रमांक: पूरक-२०२३/प्र.क्र.६२/अर्थ-३, दिनांक २८ जुलै, २०२३

६. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक:पुरक-१९२३/प्र.क्र.३६/१७स, दिनांक ३१.०७.२०२३.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय क्रमांक:ससाका-२०१९/प्र.क्र.८०/३स, दिनांक ५ सप्टेंबर, २०१९ अन्वये राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) यांच्याकडून देण्यात येणारे मार्जिन मनी लोन महाराष्ट्र शासनामार्फत (Routed Through State Government) सहकारी साखर कारखान्यांना उपलब्ध करून देण्यासाठी प्राप्त प्रस्तावांची तांत्रिक व आर्थिक छाननी करण्यासाठी साखर आयुक्त, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्यात आली आहे. संदर्भाधीन येथील शासन निर्णय दिनांक ४.५.२०२३ अन्वये सुधारीत धोरण तयार करण्यात आलेले असून असे प्रस्ताव आर्थिक व तांत्रिक छाननी समितीच्या शिफारशी नंतर मंत्री मंडळ उपसमितीसमोर ठेवण्याची तरतूद करण्यात आलेली आहे तसेच पात्रता निकष ठरविण्यात आले आहेत. मा.मंत्री (सहकार) हे सदर समितीचे अध्यक्ष आहेत.

त्यानुषंगाने प्राप्त प्रस्तावांवर मा.मंत्रीमंडळ उपसमितीच्या दिनांक ३०.५.२०२३ च्या बैठकीत झालेल्या मान्यतेनुसार राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) यांच्याकडून खेळत्या भागभांडवलापोटी देण्यात येणारे मार्जिन मनी लोन महाराष्ट्र शासनामार्फत (Routed Through State Government) उपलब्ध करून देण्यासाठी राष्ट्रीय सहकार विकास निगम यांच्याकडे महाराष्ट्र शासनामार्फत ६ पात्र सहकारी साखर कारखान्यांचे प्रस्ताव सादर करण्यात आले होते. सदर प्रस्तावांना अटी व शर्तीच्या अधीन राहून राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC), नवी दिल्ली यांच्या दिनांक २७.६.२०२३ रोजीच्या पत्रान्वये मंजुरी प्राप्त झालेली आहे. सदर मंजूर कर्ज एकूण ६ पात्र सहकारी साखर कारखान्यांना वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) यांचेकडून महाराष्ट्र शासनामार्फत (Routed through State Government) खेळत्या भांडवलासाठी एकूण ६ पात्र सहकारी साखर कारखान्यांना रु.५४९.५४ कोटी (पाचशे एकोणपन्नास कोटी चोपन्न लाख फक्त) इतक्या रकमेचे मार्जिन मनी लोन मंजूर करण्यासंदर्भात मा.मंत्रीमंडळ उपसमितीच्या दि.३०.०५.२०२३ च्या बैठकीत निर्णय घेण्यात आला आहे.

त्यानुसार खालील सहकारी साखर कारखान्यांना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या रक्कमांसाठी राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) यांचेकडून मार्जिन मनी लोन उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **कारखान्याचे नांव** | **मार्जिन मनी लोन (रु. कोटी)** |
|---|---|---|
| १ | श्री. शंकर सहकारी साखर कारखाना लि. सदाशिवनगर, ता. माळशिरस, जि. सोलापूर | ११३.४२ |
| २ | शेतकरी सहकारी साखर कारखाना लि. किल्लारी, ता. औसा, जि. लातूर. | ५०.०० |
| ३ | भिमा सहकारी साखर कारखाना लि. टाकळी सिकंदर, ता. मोहोळ, जि. सोलापुर | १२६.३८ |
| ४ | कर्मयोगी शंकररावजी पाटील सहकारी साखर कारखाना लि. महात्मा फुलेनगर, ता. इंदापूर, जि. पुणे | १५०.०० |
| ५ | निरा भिमा सहकारी साखर कारखाना लि., शहाजीनगर, ता. इंदापूर, जि. पुणे. | ७५.०० |
| ६ | श्री.रामेश्वर सहकारी साखर कारखाना लि. रावसाहेबनगर, सिपोरा बाजार, ता. भोकरदन, जि. जालना | ३४.७४ |
| | **एकूण** | **५४९.५४** |

**२. सदर मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-**

अ. राष्ट्रीय सहकार विकास निगम, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. NCDC: २१- ८/२०२३-Sugar/१५०/SB३०१२५/९० दिनांक २७ .०६.२०२३ रोजीच्या मंजुरीपत्रातील नमुद अटी व शर्ती सदर कर्जास लागू राहतील.

१. सदर कर्ज आठ वर्षाच्या कालावधीसाठी असेल, ज्यात मुद्दल परतफेडीबाबतचा दोन वर्षे विलंबावधीचा समावेश आहे. तथापि व्याज भरण्यासाठी कोणतीही विलंबावधी राहणार नाही, विलंबावधीमध्ये कर्जावरील व्याजाचा भरणा करणे कारखान्यांना बंधनकारक राहील.

२. कर्जाचा व्याज दर हा प्रत्यक्ष कर्ज वितरणावेळीचा प्रचलीत व्याज दराप्रमाणे असेल. व्याज मासिक चक्रवाढ आधारावर प्रत्येक महिन्याच्या शेवटच्या दिवशी चक्रवाढ पद्धतीने आकारले जाईल. तथापि व्याज आणि मुद्दलाची परतफेड वार्षीक पध्दतीने केली जाईल.

मासिक चक्रवाढ आधारावरील परिगणेसाठीचा सध्याचा प्रचलीत फ्लोटिंग व्याज दर ९.४६% आहे. देय तारखेला किंवा त्यापूर्वी हप्त्याचे पेमेंट न मिळाल्यास सामान्य दर (फ्लोटिंग व्याज दर + १ % जादा) १०.४६ % लागू होईल. हप्ते भरण्यास चूक झाल्यास सामान्य दरापेक्षा २.५ % दराने दंडात्मक व्याज विलंबाच्या कालावधीसाठी थकित हप्ता रकमेवर आकारले जाईल. व्याजाची परतफेड ही कर्ज उचलीच्या तारखेपासून परतफेडीस पात्र मानल्या गेलेल्या तारखेच्या पहिल्या वर्षापासून सुरू होईल. इतर अटी व शर्ती ह्या एनसीडीसी च्या दिनांक १५.१०.१९८४ व दिनांक १४.०२.२०२३ रोजीच्या पत्रान्वये कळविल्याप्रमाणे असतील आणि वेळो वेळी सुधारित केल्याप्रमाणे कळविल्या जातील.

३. सहकारी साखर कारखान्याच्या संचालक मंडळावर एका सदस्याची नियुक्ती करण्याचा अधिकार एनसीडीसी ला असेल, सदर सदस्य सभांना उपस्थित राहण्याचा खर्च संबंधित कारखान्यांनी भागवला पाहिजे.
४. ज्या उद्देशासाठी कर्ज अर्थसहाय्य दिलेले आहे त्यासाठी जर वापर केला गेला नाही तर एनसीडीसी/राज्य शासनास कर्ज foreclose and recover (बंद करण्याचा आणि वसूल करण्याचा) अधिकार असेल.
५. साखर कारखान्यांच्या कामकाजाची आणि आर्थिकस्थिती तपासणी/पुनरावलोकन करण्यासाठी अधिकारी नियुक्त करण्याचा अधिकार एनसीडीसी/राज्य शासनला असेल आणि किंवा कोणत्याही एजन्सी मार्फत ते करण्याचा अधिकार एनसीडीसी/राज्य शासनाला असेल. त्यासंदर्भातील संपूर्ण खर्च संबंधित कारखान्यांनी भागवला पाहिजे.
६. कोणत्याही अटी व शर्तीचे उल्लंघन झाल्यास, एनसीडीसी/राज्य शासनाला कर्ज मंजुरी रद्द करण्याचा आणि दिलेल्या कर्जाची संपूर्ण रक्कम व्याजासह वसूल करण्याचा अधिकार असेल.
७. राज्य सरकार त्यांच्या कर्जाची परतफेड वेळेवर होण्याचे सुनिश्चित करण्यासाठी Tagging/Escrow (टॅगींग/एस्क्रो) पध्दतीचा वापर करेल.
८. कर्जाची परतफेड होईपर्यंत, साखर कारखान्यांच्या कामकाजाच्या आणि आर्थिक स्थितीवर लक्ष ठेवण्यासाठी सहामाही पध्दतीने एनसीडीसीचे प्रतिनिधी साखर कारखान्यांना भेट देतील.

ब. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या दिनांक ४ मे २०२३ रोजीच्या शासन निर्णयातील अटी व शर्ती आणि धोरणात्मक निर्णय लागू राहतील.

१. सदरील कर्ज व त्यावरील संपूर्ण व्याजाच्या परतफेडीकरीता संपूर्ण संचालक मंडळ वैयक्तिक व सामुहीकरित्या जबाबदारी राहतील. याबाबत संबंधीत संचालकांनी कर्ज वितरणापूर्वी बंधपत्र सादर करणे बंधनकारक राहील.
२. कारखान्याने उत्पादीत व विक्री केलेल्या साखरेच्या तसेच ऊसाचा रस किंवा सिरप यांची थेट विक्री केल्यामुळे येणाऱ्या रकमेतून रु. २५०/- प्रति क्विंटल टॅगींगद्वारे प्राधान्याने कर्ज हप्त्याची (मुद्दल+व्याज) रक्कम वसूल करावी. देय कर्ज हप्त्याची (मुद्दल+व्याज)

रक्कम पूर्ण वसुल होत नसेल अशा वेळी कारखान्याच्या उपपदार्थ ( सहवीज, डिस्टीलरी, इथेनॉल) विक्री या मार्गाने योणाऱ्या उत्पन्नातुन उर्वरीत रक्कम वसुल करावी.

३. कारखान्याकडे यापूर्वीचे शासकीय भाग भांडवल, शासकीय कर्ज व शासकीय थक हमी शुलक् येणे बाकी असल्यास त्याचे वसुलीकरीता रु. २५/- प्रति क्विंटल टॅगींगद्वारे रक्क्म भरणा करणे बंधनकारक राहील.

४. सदर कर्जाची थकबाकी निर्माण झाल्यास १ महिन्याचे आत संचालक मंडळ बरखास्त करण्यात येईल व शासकीय प्रशासकीय मंडळ नियुक्त करण्यात येईल.

५. कारखान्यावर साखर आयुक्त कार्यालयाने निर्माण केलेल्या कार्यकारी संचालकांच्या पॅनेलवरील कार्यकारी संचालकाची नेमणूक करणे बंधनकारक राहील.

क. कर्ज परतफेडीबाबत अवलंबवावयाची कार्यपध्दती

१. सदर योजनेअंतर्गत अदा करण्यात आलेल्या कर्जाची व्याजासह (अनुज्ञेय असल्यास दंडव्याजासह) विहीत मुदतीमध्ये परतफेड करण्याकरीता साखर कारखान्याकडून प्रति क्विंटल साखर विक्रीवर टॅगींगव्दारे तसेच प्राथमिक आणि दुय्यम उपपदार्थांच्या विक्रीमधून आवश्यकतेप्रमाणे कपात करून शासकीय कोषागारात भरणा करावयाच्या रकमांचा दरमहा भरणा करण्याकरीता संबंधीत सहकारी साखर कारखान्याचे कार्यकारी संचालक आणि संबंधीत प्रादेशिक सहसंचालक (साखर) यांचे संयुक्त बचत बँक खाते राष्ट्रीयकृत बँकेमध्ये उघडण्यात यावे. कर्ज वितरणानंतर १ महिन्याचे आत सदरचे संयुक्त बचत खाते उघण्यात यावे.

२. सदर संयुक्त बचत बँक खात्यामध्ये, साखर कारखान्याने साखर विक्रीच्या प्रत्येक व्यवहारामधून प्रति क्विंटल साखर विक्रीवर टॅगींगव्दारे कपात करावयाच्या रकमांचा भरणा करावा.

३. या खात्यामध्ये जमा झालेल्या रकमेमधून आर्थिक वर्षामध्ये व्याज / दंडव्याजासह (अनुज्ञेय असल्यास) अदा करावयाच्या कर्जाच्या मुद्दल रकमेइतकी रक्कम जमा न झाल्यास सदर संयुक्त बचत बँक खात्यामध्ये साखर कारखान्यांकडून विक्री करण्यात आलेल्या इथेनॉल, सहविजनिर्मीती प्रकल्पातील वीज, बगॅस, मोलॅसिस, प्रेसमड आणि इतर तत्सम बाबींचे विक्रीमधून प्राप्त झालेली रक्कम प्राधान्याने त्या त्या आर्थिक वर्षामध्ये अदा करावयाच्या रकमेइतकी भरणा करावी.

४. सदर संयुक्त बचत बँक खात्यामध्ये जमा करण्यात आलेल्या रकमेचा वापर, फक्त या योजनेअंतर्गत परतफेड करावयाचे कर्ज मुद्दल, कर्जावरील व्याज आणि दंडव्याज (अनुज्ञेय असल्यास) परतफेड करण्याच्या प्रयोजनाशिवाय इतर कोणत्याही प्रयोजनाकरीता करता येणार नाही.

५. आर्थिक वर्षामध्ये सदर योजनेअंतर्गत परतफेड करावयाच्या मुद्दल, व्याज आणि दंडव्याज (अनुज्ञेय असल्यास) रकमांचे आर्थिक वर्ष सुरू होण्यापूर्वी निर्धारण करून त्याप्रमाणे संयुक्त बचत बँक खात्यामध्ये परतफेडीकरीता रकमा जमा करण्याची संपूर्ण जबाबदारी ही संबंधीत साखर कारखान्याच्या संचालक मंडळाची राहील.

६. साखर आयुक्तालयाने निर्धारीत केलेल्या विहीत नमुन्यामध्ये दर महिन्याच्या ०५ तारखेस मागील महिना अखेर प्रतिक्विंटल साखर विक्रीवर टॅगींगव्दारे आणि आवश्यकतेप्रमाणे प्राथमिक व दुय्यम उपपदार्थाच्या विक्रीमधून संयुक्त बचत बँक खात्यामध्ये जमा करण्यात आलेल्या रकमांचा तपशील, शासकीय कोषागारामध्ये चलनाव्दारे भरणा करण्यात आलेल्या रकमांचा तपशील, उपलब्ध साखर साठयाचा तपशील, विक्री केलेल्या साखरेचा तपशील, विक्री केलेल्या व शिल्लक असणाऱ्या प्राथमिक आणि दुय्यम उपपदार्थांच्या साठयाचा तपशील आणि सदर योजनेअंतर्गत संबंधीत सहकारी साखर कारखान्याच्या संचालक मंडळावर बंधनकारक असलेल्या अटी व शर्तींचे पालन झालेले आहे किंवा नाही इत्यादीबाबतचा तपशील संबंधीत सहकारी साखर कारखान्याचे कार्यकारी संचालक आणि प्रादेशिक सहसंचालक (साखर) यांचे संयुक्त स्वाक्षरीने सदर योजनेअंतर्गत अदा करण्यात आलेल्या संपूर्ण रकमांची परतफेड होईपर्यंत साखर आयुक्तालयास सादर करणे अनिवार्य राहील.

७. कर्ज विनीयोगाबाबत कारखान्याच्या कार्यकारी संचालक यांनी दरमहा त्याबाबतचा अहवाल सविस्तर तपशीलासह प्रादेशीक सहसंचालक (साखर) यांना सादर करावा. प्रादेशीक सहसंचालक (साखर), यांनी त्याची पडताळणी करुन त्याबाबतचा दरमहा अहवाल साखर आयुक्तालयास सादर करावा.

८. साखर कारखान्याचे संबंधीत वैधानिक लेखापरीक्षक यांनी सदर कर्ज रकमेचा विनियोग दाखला सादर करणे, तसेच सदर कर्ज रकमेच्या परतफेडीबाबतचा तपशील सविस्तरपणे त्यांचे लेखापरीक्षण अहवालामध्ये नोंदविणे आवश्यक आहे.

ड. कारखान्याच्या मालमत्तेचे विवरणपत्र संबंधित कारखान्यांनी सादर करावेत. जर वसुली झाली नाही तर कारखान्यांच्या मालमत्तेतून देखील कर्जाची वसुली करण्यात येईल, याचा समावेश त्रिपक्षीय करारात करण्यात यावा.

इ. सदर कर्ज रु. ५४९.५४ कोटीची परतफेड करण्यासाठीचा कालावधी ८ वर्षे राहील, सुरुवातीचे २ वर्षे विलंबावधी (Moratorium period) असेल. विलंबावधीमध्ये (Moratorium period) व्याजाचा भरणा करणे अनिवार्य असून तदनंतर मुद्दल व व्याजासह ६ समान वार्षिक हप्त्यात ( सन २०२५-२६ ते २०३०-३१ ) कर्जाची परतफेड करावी. तसेच सन २०२३-२४ च्या गाळप हंगामापासून जे उत्पन्न मिळेल त्यातून प्राथम्याने कर्जाचा वार्षिक हप्ता (मुद्दल+व्याज) वसूल करण्याबाबत आयुक्त, साखर यांनी खात्रीशीर वसूलीसाठी निश्चित अशी व्यवस्था करावी.

फ. कारखान्याकडून उत्पादन / विक्री होणाऱ्या साखरेतून मिळणारी व धनाकर्ष, RTGS, NEFT, इत्यादी स्वरुपात प्राप्त होणारी रक्कम साखर कारखाना साखर मालतारण कर्ज असणाऱ्या ज्या बँकेत भरणा करेल त्या संबंधीत बँके समवेत साखर कारखाना व साखर आयुक्त किंवा त्यांनी प्राधिकृत केलेले प्रतिनिधी यांचेमध्ये कारखान्याने उत्पादीत व विक्री केलेल्या साखरेच्या तसेच ऊसाचा रस किंवा सिरप यांची थेट विक्री केल्यामुळे येणाऱ्या रकमेतून रु. २५०/- प्रति क्विंटल टॅगींगद्वारे वसुल केलेली रक्कम कारखान्याचे कार्यकारी संचालक

आणि प्रादेशिक सहसंचालक (साखर) यांचे संयुक्त बचत बँक खात्यामध्ये जमा करणेबाबत त्रिपक्षीय (Triparty Agreement) करार करण्यात यावा.

३. सदर निधी मागणी क्रमांक व्ही (V), ६४२५ - सहकारासाठी कर्जे, (१०८) इतर सहकारी संस्थांना कर्जे, (०३) सहकारी साखर कारखाने, (०३)(११) सहकारी साखर कारखान्यांना खेळत्या भांडवलासाठी सिमांत रक्कम म्हणून कर्ज (रा.स.वि.नि.) ५५ कर्जे व आगाऊ रक्कम (६४२५ ०६५४) (कार्यक्रमांतर्गत) या लेखाशिर्षाखाली अंतिमत: खर्ची टकण्यात यावा.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित सहकारी साखर कारखान्यांना अदा करण्यासाठी प्रस्तुत प्रकरणी लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व साखर आयुक्त, साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यानुसार लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांनी रक्कम आहरित करून संबंधितांना अदा करण्याची कार्यवाही त्वरीत करावी.

५. सदर शासन निर्णय मा. मंत्री मंडळ उपसमितीच्या दि. ३०.०५.२०२३ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४७४/२०२३/व्यय-२, दि.०४.०७.२०२३ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निणर्य महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आला असून त्याचा संकेतांक २०२३०८०३१७२१५९४००२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरी करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHINGADE
ANKUSH
PANDURANG

Digitally signed by SHINGADE ANKUSH PANDURANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=0619305c0a0825664efa457ffa51c3f2364841c81f8c437078a333b7111446a2,
pseudonym=18BA78965A42BF3AA081DE760471DB6306C88F1D,
serialNumber=E11F71FCAC231B0F91F430636DE14F6C49B569D173346155B9208DCD97DD078B, cn=SHINGADE ANKUSH PANDURANG
Date: 2023.08.03 17:27:44 +05'30'

**(अंकुश शिंगाडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मा.राज्यपाल महोदय यांचे खाजगी सचिव
२. मा.मुख्यमंत्री महोदय यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, (सहकार व पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
८. मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
९. मा. मंत्री (शालेय शिक्षण व मराठी भाषा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

१०. मा. मंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२. सर्व विधान परिषद सदस्य, विधान भवन, मुंबई
१३. सर्व विधान सभा सदस्य, विधान मंडळ, मुंबई
१४. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
१५. सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर)
१६. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१७. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर.
१८. महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखानर संघ मर्या., मुंबई
**१९.** निवड नस्ती (३-स).